मोबाईल टॉवर वरील मालमत्ता कर व अनधिकृत टॉवरसाठी समिती स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.२४२/नवि-२०**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
४ था मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १० डिसेंबर, २०२१.

**प्रस्तावना:-**

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलेल्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार विविध महानगरपालिका व नगरपरिषदांमध्ये मोबाईल टॉवरवर आकारण्यात येणारा प्राप्तीकर हा वेगवेगळा असल्याने सदर प्राप्तीकर एकसमान / सुसूत्रीकरण करण्यासाठी तसेच राज्यातील अनधिकृत मोबाईल टॉवर अधिकृत करण्यासाठी काय कार्यपध्दती असावी व किती कालावधीत सदर कार्यवाही पूर्ण करावी याबाबत शासन स्तरावर समिती नेमण्याबाबतचा विषय शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय:-**

राज्यातील मोबाईल टॉवरवरील आकारण्यात येणाऱ्या मालमत्ता कराचे सुसूत्रीकरण करण्यासाठी तसेच अनधिकृत मोबाईल टॉवर अधिकृत करण्यासाठी कार्यपध्दती निश्चित करणेबाबत व याकरिताचा कालावधी विहित करण्याबाबत आवश्यक त्या उपाययोजना सुचविण्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संबंधित अधिकारी | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २. | अप्पर मुख्य सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३. | अप्पर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४. | सचिव / प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५. | आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, मुंबई | सदस्य-सचिव |

सदर समितीस आवश्यक वाटतील अशा क्षेत्रीय अधिकाऱ्यांना व इतर संबंधितांना, सदर समिती विचार विनिमयासाठी निमंत्रित करु शकेल.

**या समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:-**

- राज्यातील मोबाईल टॉवरवर आकारण्यात येणारा प्राप्तीकर यांचे सुसूत्रीकरण करणे तसेच या आधीच्या थकबाकी बाबत विचार करणे.
- अनधिकृत मोबाईल टॉवर अधिकृत करण्यासाठी कार्यपध्दती व कालावधी निश्चित करणे.
- Access Charges याबाबत मार्गदर्शक सूचना निश्चित करणे.
- Restoration Charges (ROW) निश्चित करणे.

उपरोक्त विषयाच्या अनुषंगाने उपाययोजना सुचविण्यात याव्यात व समितीचा अहवाल १५ दिवसांत सादर करण्यात यावा.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१०१५४२१४९९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by C Priyanka
Date: 2021.12.10 15:44:53 +05'30'

**( प्रियांका कुलकर्णी-छापवाले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री नगर विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री नगर विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३) अप्पर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अप्पर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव / प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१), मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई.
८) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी मुंबई.
९) निवडनस्ती, कार्यासन नवि-२०.